डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला येथील रोजंदारी मजुरांना समान काम समान वेतनाच्या अनुषंगाने थकबाकीची रक्कम देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-१६१८/प्र.क्र.१५१/६-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील रोजंदारी मजुरांच्या बाबतीत समान काम व समान वेतनाच्या अनुषंगाने थकबाकी मिळण्याबाबत मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.२२२२/२००२, २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ दाखल करण्यात आल्या होत्या. त्यामध्ये दि.१५.०२.२०१९ रोजी सामायिक निर्णय (Common decision) देताना मा.उच्च न्यायालयाने पुढीलप्रमाणे नमूद केले-

**" In this view of the matter, and the principle of equal pay for equal work, we are of the considered opinion that the petitioner are entitled to the benefit of the directions issued by the Hon'ble Supreme Court dated 24.7.2001 in Civil Appeal 8646 to 8659 of 1997, and we order accordingly. The respondents shall work out and pay to the petitioners the financial benefits payable to the petitioners before 30.09.2019"**

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने रोजंदारी फरकाची रक्कम डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला विद्यापीठास उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.२२२२/२००२, २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ मध्ये दि.१५.०२.२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने रोजंदारी फरकाची रक्कम देण्यासाठी **रु.२.६० कोटी (रुपये दोन कोटी साठ लाख फक्त)** एवढा निधी या शासन निर्णयाद्वारे डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठास उपलब्ध करून देण्यात येत आहे

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.डी-३, ०१ पीक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०३) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) (२४१५ ००४३) या लेखाशिर्षांतर्गत चालू वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा. आहरण व संवितरण अधिकारी/ उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला यांनी सदरचा निधी

नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांना अदा करण्याबाबतची कार्यवाही करावी.

३. सदर प्रकरणी रोजंदारी मजुरांना समान काम समान वेतनानुसार देय असलेल्या रकमेची सखोल पडताळणी करून फरकाची रक्कम ही पात्र याचिकाकर्त्यांनाच देण्यात यावी. याबाबतची संपुर्ण जबाबदारी ही विद्यापीठ स्तरावरील संबंधित अधिका-यांची असेल, याची दक्षता घ्यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- २०७/२०२०/व्यय-१, दिनांक १३ ऑक्टोबर, २०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२०१०२३१७३०५६११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.10.23 17:03:54 +05'30'

**(सु. सं. धपाटे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव , मंत्रालय मुंबई ३२.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई ३२.
३. कुलगुरू/ कुलसचिव/ नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
४. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
६. वित्त विभाग(अर्थसंकल्प शाखा-२/व्यय-१), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन २-अे (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती (६-अे).